मागील अध्यायात गोरक्षनाथांनी श्रीगुरू मच्छिंद्रनाथांना मोठ्या हिकमतीने शोधून काढले आणि महाराणी किलोत्त्लेला निक्षून सांगितले की मी श्रीगुरूंना येथून घेऊन जाणार. पण मोहमायेने बद्ध मच्छिंद्रनाथ कालापव्यय करीत आहेत हे ध्यानांत आल्यावर त्यांनी स्पष्टपणे गुरदेवांना खडे बोल सुनावले, त्यांच्या पराक्रमाच्या इतिहास त्यांनी ऐकविला आणि कोणत्या कार्यसाठी आपल्याला अवतार घ्यावा लागला याची जाणीव करून दिली, त्यांची पूर्वीची ब्रम्हस्थिती कवीनारायणाची होती याचे स्मरण करून दिले. शिष्याचा स्पष्टवक्तेपणामुळे मच्छिंद्रनाथांचे डोळे खाडकन उघडले आणि त्यांनी गोरक्षनाथाबरोबर स्वदेशी परतण्यास होकार दिला पण महाराणी मैनाकिनीचा आग्रह आणि महाराजांची दोलायमान मनस्थिती यात पुन्हा सहा महिन्यांचा काळ गेला. यथावकाश वर्ष प्रतिपदेच्या दिवशी मच्छिंद्रनाथ, गोरक्षनाथ आणि महाराजाचा पुत्र मीननाथ हे तिघे स्त्री राज्यातून स्वदेशी निघाले. मैनाकिनी आणि राज्य महालातील सेविकांनी दारूण शोक आणि त्यावर गोरक्षानाथांविषयी क्षोभ प्रकट केला पण गोरक्षनाथ निश्चयापासून ढळले नाहीत. असह्य दुःखाने महाराणीची शुद्ध हरपली. त्याचवेळी उपरिचर वसु पृथ्वीवर अवतरले आणि तिला सांगितले, “हे सर्व विधीलिखिताप्रमाणे घडत आहे आणि या निमित्तातून मी दिलेल्या शापातून तुझी मुक्तता ही झाली आहे याचा आनंद मान आणि माझ्याबरोबर सिंहलद्वीपात चल!”

महाराणी किलोत्त्लेची विफलता आणि दारूण्य नैराश्य पाहून उपरीचर वसु तिचे सांत्वन करतांना म्हणाले, “पद्मिनी कशासाठी शोक करत आहेस जे काही दृश्यमान आहे. ते सर्व अशाश्वत आहे. गूढ माया आहे. त्या मायेच्या आभासासाठी तू शोक करणे हे सर्वस्वी गैर आहे कारण तू स्वर्गलोकातील कामिनी आणि मच्छिंद्र भूलोकातील पण प्रारब्ध योगाने स्वर्ग आणि भूमीच्या गाठभेट झाली. भाग्यात होता तेवढा सहवास भोगला गेला आहे. आता त्यासाठी हट्ट करणे सोडावे. मच्छिंद्र सूज्ञ असल्याने स्वहित ओळखून नियोजित अवतारकार्यास रवाना झाला आहे. आता तू पुन्हा सिंहलद्वीपात जाणे इष्ट आहे कारण तुझ्या प्रमादामुळे तू पद्च्युत होऊन येथे आली होतीस आता पूर्वपदी विरामान होण्याची रास्त वेळ आली आहे. असे पूर्वसुकृत असल्यामुळे शुभ घडीची संधी साध आणि सिंहलद्वीपावर चल, बारा वर्षांनी मच्छिंद्र, गोरक्ष, मीननाथांसह सर्व तपस्वी नाथ तुला तेथे भेटणारच आहेत. सिंहलद्वीपावर देवराज इंद्र महायज्ञ करतील, त्यावेळी तेथे ब्रम्हा, विष्णू, महेश यांच्यासह सर्व देव अवतरतील. त्यावेळी नऊ नाथाशी तुझी पुनर्भेट होईल. आता व्यर्थ शोक करू नकोस. तुझे अश्रू पूस आणि प्रसन्न मनाने विमानात बस! सिंहलद्विपावर जाण्याची वेळ आली आहे.”

मैनाकिनी अर्थात पुर्वाश्रमीची किलोत्त्ला म्हणाली, “श्वशूरजी महाराज! बारा वर्षांनी मच्छिंद्रनाथांची भेट होईल म्हणता? ठीक आहे. देवराज इंद्र महायज्ञ करो, अथवा न करो, परंतु मच्छिंद्रनाथांची भेट घडवून द्याल असे वचन द्यावे. जर आपण वचन दिले तरच मी सत्य मानून त्या क्षणाची वात पाहीन. माझे दुःख आवरून केवळ त्यासाठी माझ्या प्राणाचे रक्षण करीन, अन्यथा मला जगणे नको.” उपरिचर वसु हसून म्हणाले, “पुत्री! तू माझी स्नुषा आहेस. मी तुझ्याशी खोटं बोलणार नाही. तुझी भेट घडवून आणीन हे माझे तुला वचन आहे.” उपरिचर वसुंच्या आश्वाश्नामुळे मैनाकिनी सावरली आणि म्हणाली, “महाराज! धन्यवाद, तुम्ही माझ्या जगण्याला अर्थ प्राप्त करून दिला, तरीही या शैल्यराज सिंहासनावर

कोणाची तरी नियुक्ती होणे हे सुद्धा आवश्यक आहे. अन्यथा बेजबाबदारी केल्यासारखे होईल. तिच्या या विधानाशी वसु सहमत झाले आणि त्यांनी दौर्भामा नामक सुयोग्य अशा कामिनीची शैल्यस्वामिनी व्हावी म्हणून शिफारस केली.

उपरिचर वसुंची शिफारस प्रमाण मानून मैनाकिनीने दौर्भामाचा राज्यभिषेक करून सिंहासनावर बसविली. राजनिती, राजकारण यांविषयी तिचे प्रभोधन केले आणि प्रजेचा प्रेमाने सांभाळ करण्यास सांगितले नंतर सर्वच शोकमग्न स्त्रयांची समजूत काढून निरोप घेतला. दुःखी कष्टी अशा मनस्थितीत ती विमानात बसून सिंहलद्वीपावर आली. दिवसभर चारापाण्यासाठी विहरत असलेले पक्षी सायंकाळी आपआपल्या घरट्यात परत येतात, त्याचप्रमाणे सागराच्या पाण्यापासून निर्माण झालेले मेघ, पर्जन्यवर्षाव करून नदीच्या प्रवाहाने पुन्हा सागरास मिळतात, त्याप्रमाणे शापमुक्त पद्मिनी सिंहलद्वीपावर मुळस्थानी परतली. उपरिचरांनी तिची पूर्वपदावर स्थापना करून ते स्वस्थानी निघून गेले. देहाने स्वर्गात असलेल्या किलोत्त्मा प्राण मात्र भूमीवरच घुटमळत होता.

आपण मोहमायेच्या शृंखलेतून श्रीगुंची सुटका केली. श्रीगुरुनीही आपल्या विनंतीचा स्वीकार करून राजवैभवाचा त्याग केला म्हणून गोरक्ष कृतकृत्य झाला, गोरक्षनाथांना हजारो हत्तीचे बळ प्राप्त झाले. मीननाथाला खांद्यावर घेऊन आणि गूरुदेवांच्या हाताला आधार देत त्यांचा प्रवास सुरु आहे. नद्या, नाले, पर्वत, घनदाट अरण्ये ओलांडत भूमी पादाक्रांत करीत आहेत. सूर्यद्याला त्यांच्या प्रवासाला आरंभ होई. प्रवासमार्गातील नगरांत, गावात भिक्षा मागून उदर निर्वाह करावयाचे आणि सूर्यास्तानंतर मुक्काम करावयाचा असा नित्यक्रम होता. पाहता पाहता वादळी वेगाने त्यांनी स्त्रीराज्याच्या सिमेबाहेर पडून कौलबंगाल देशात प्रवेश केला, काही दिवसानंतर त्याच्या पुढील गौड बंगाल देशाच्या सीमेत प्रवेश केला. योगायायोगाना मार्गक्रमणात, ज्या ठिकाणी कानिफनाथांची भेट झाली होती त्या आमराईत ते आले. त्यांनी मीननाथाला खांद्यावरून खाली उतरविले. भूतकाळाच्या स्मृतीत ते हरवून गेले. याच पुण्यवान भूमीवर कानिफनाथांनी श्रीगुरु मच्छिंद्रनाथांचा ठावठिकाणा सांगितला होता आणि त्या अनुषंगाने शोध घेणे सुकर झाले होते. म्हणून त्या स्थानाला त्यांनी श्रद्धेने वंदन केले. तसेच कानिफनाथांचेही स्मरण करून नमन केले. यावेळी त्यांचे अश्रूंनी डबडबलेले नेत्र पाहून श्रीगुरूंनी विचारले, “गोरक्षा, तुझ्या डोळयांत अश्रू कशामुळे आले?” तेव्हा गोरक्षाने सांगितले, “पूर्वीचा वनवास आठवून कंठ गहीवरला त्या पावन भूमीवर बैठक मारली. काही क्षणानंतर दुःखाचा आवेग ओसरल्यावर मन स्थिर झाले. मग गुरुदेवांना सांगू लागला, “याच ठिकाणी कर्ण कानिफाची भेट होऊन त्यांच्या मुखाने मला आपला शोध गवसला, याच पुण्य पावन भूमीत मला माझे गुरुचरण सापडले. मी तर दुःखसारीतेमध्ये निर्माण झालेल्या भोवऱ्यात गटांगळ्या खात बुडणारच होतो. दुःखरुपी क्रूर श्वापदाच्या जबड्यात माझी मान अडकली होती तेव्हा ह्या भूमातेने कानिफाची आणि माझी भेट घडवून मुक्तता केली. तुमची आणि माझी ताटातूट हा माझ्यासाठी वियोगाचा प्रलयाग्नी आणि त्यांत मी जळत होतो. तुमच्या वियोगाचा फास माझ्या कंठास आवळला गेला होता. तेव्हा याच भूमीत मला अमृत सापडले, माझ्यासाठी ही साधी भूमी नव्हे, तर पवित्र शीतल धन आहे.” असे म्हणून भूमिमाता कपाळावर लावली. श्रीगुरूंनी त्याला प्रेमाने कवेत घेऊन त्याचे सांत्वन केले. मनात विचार केला, “हा खरोखर निष्टावंत आणि अद्वितीय गुरुभक्त आहे. यासम हाच! अन्य कुणी नाही.” मग त्यांनी मीननाथाला कडेवर घेतले आणि म्हणाले, “उठ वत्सा; चल अजून पुष्कळ मजल मारायची आहे.” पुनश्च प्रवास सुरु झाला. मार्गक्रमण करीत असतांना गोरक्षनाथांचे गुरुबंधू अग्नीपुत्र जती जालिंदर नाथांचे वृत्त कथन केले. हे सारे ऐकून मच्छिंद्रनाथ संतप्त होऊन

म्हणाले, “माझ्या गुरुबंधुची अशी अवस्था करणाऱ्या राजा गोपीचंदाचे तळपट करून टाकीन.” क्रोधीत झालेले गुरुशिष्य दोन चार मुक्कामानंतर हेलापट्टण राजनगरीत येऊन पोहोचले.

नगरीत प्रवेश करण्यापूर्वीच त्यांना ग्रामस्थांकडून कळले की, कानिफनाथांनी गुरु जालिंदरनाथांना मुक्त केले आणि गोपीचंद राजाला गुरुदेवांनी अनुग्रह देऊन अमर केले आहे. राजा नाथपंथी जोगी होऊन तपासाठी निघून गेला असून त्याचा पुत्र मुक्तचंद सिंहासनावर विराजमान आहे. हे सारे इतिवृत्त समजल्यानंतर मच्छिंद्रनाथांचा क्रोधाग्नी शांत झाला. जसा की प्रलयाग्नीवर मेघवृष्टी होऊन अग्नी शांत व्हावा, त्रितापदग्ध साधकाला श्रीगुरुंच्या सान्निध्यामुळे शांती प्राप्त व्हावी, सुर्योद्याने अंधःकार नाश पावून प्रकाश पसरावा, त्याप्रमाणे मच्छिंद्रनाथांचा राग शांत होऊन त्यांना वास्तवाची जाणीव झाली.

त्यांनी ग्रामस्थांना विचारले, “मुक्तचंदाच्या वतीने कोण अशीकारी राज्यकारभार सांभाळतो आहे?” “स्वामीजी, मुक्तचंदाच्या वतीने गोपीचंदाची माता कारभार करीत आहे. त्या सतशील आणि बुद्धिवंत मातेने गुरुदेव जालिंदरनाथांना प्रसन्न करून स्वतःसह पुत्र गोपीचंदाला सुद्धा अजरामर करून कीर्ती मिळवली आहे.” असे उत्तर मिळाले, अशा प्रज्ञावंत योगिनीची भेट घेण्याचे योजन गुरुदेवांनी द्वाररक्षकांना सांगितले की, “सती मैनावतीला सांगा की जालिंदरनाथांचा गुरुबंधू मच्छिंद्रनाथ आपल्या शिष्यसह भेटीसाठी महाद्वारावर प्रतीक्षा करीत आहीत.” हे ऐकताच द्वारपालाने नम्रतेने अभिवादन केले आणि त्वरेने निरोप घेऊन राजमातेकडे गेला, मुजरा करून म्हणाला, “राजमाता! महाद्वारावर जती जालिंदरनाथांचा गुरुबंधू असल्याचा दावा करीत मच्छिंद्रनाथ नामक तपस्वी त्यांच्या शिष्यसह आपल्या भेटीची परवानगी मागत आहे.”

“कसे आहेत ते? त्यांच्या वेष, तेज, वृत्ती, विद्वत्ता कशाप्रकारची आहे? द्वारपाल म्हणाला, “काय सांगू महाराणी! सुवर्णकांती, सूर्यसारखा तेजस्वी असा कुणीतरी दिव्य अवतारी योगी वाटतात. शैली, कंथा, शिंगी, सारंगी, कुबडी, फावडी, भगवी वस्त्रे परिधान केलेले अलौकिक तपस्वी असावेत. त्यांच्याबरोबरचा तरुण शिष्य सुद्धा तितकाच तेजःपुंज आहे. एक लहान बालक सुद्धा त्याच तेजाची प्रतिकृती आहे. तिघेही नक्षत्राचे लेणे घातलेली सुस्वरूप व्यक्तीमत्वे आहेत.” ते वर्णन ऐकून तिने त्वरित महामंत्र्यांना सोबत घेऊन राजशिष्टाचारा प्रमाणे स्वागत करण्यासाठी स्वतः निघाली, महाद्वारावरील स्वागत महालात त्यांच्या चरणावर माथा टेकवून दर्शन घेतले. सुवर्णसिंहासनावर बसवून सर्वांचे षोडशोपचारे पूजन केले. विनम्रतेने विचारले, “महाराज! कुठून आलात आपण? आम्हा आळशांवर मोठीच कृपा झाली आपण रांकाचे दारिद्र्य दूर करणारे चिंतामणी आहात. आपल्या मंगल दर्शनाने आम्हास अपार आनंद झाला असून सविस्तर आपला परिचय द्यावा.”

“योगिनीमाई! मी उपरिचर वसुंचा पुत्र, श्रीदत्तात्रेयांचा शिष्य कवीनारायणाचा अवतार मच्छिंद्र आहे. हा माझा शिष्य गोरक्ष आणि बालक मीननाथ आहे. माझ्यानंतर जालिंदरनाथाला श्रीगुरु दत्तात्रेयंचा अनुग्रह प्राप्त झाला. लौकिक अर्थाने ते माझे लहान भाऊच आहेत. तुमच्या या राजनगरीत अवमान झाल्याचे ऐकून क्रोधीत होऊन आलो असता, ग्रामस्थांकडून त्यानंतरची वस्तुस्थिती समजली. त्यामुळे राग राहिला नाहीय आणि मनालाही समाधान वाटले. माई! तू धन्य आहेस. या भूमीवरील ज्ञानज्योत आहेस. तू शाश्वत सत्य जाणून आपले घर अविनाशी आनंदाने भरून टाकले आहेस. पूर्वज पातकाला नष्ट करून गुरुकृपेने स्वर्ग प्राप्तीही मिळवली आहेस. भगिरथाने जसा पितरांचा उद्धार केला,

तसा तू बेचाळीस पिढ्यांचा उद्धार केला आहेस." त्यांच्या या प्रशस्तीच्या भाष्यावर मैनावतीने पुन्हा एकदा चरणस्पर्श केला आणि म्हणाली, "ज्येष्ठ गुरुदेव! ही आपली नाथपंथीयांचीच कृपा आहे. आपण कल्पवृक्षापेक्षाही महान आहात कारण कल्पवृक्ष साधकाच्या इच्छेप्रमाणे शुभ अशुभ फळांची पूर्तता करतो पण आपण मात्र साधकाचे सदैव कल्याणाच करत आहात. परिसापेक्षाही आपण श्रेष्ठ आहात कारण परीस फक्त लोखंडाचे सोने करतो. दुसरा परीस निर्माण करू शकत नाही परंतु आपण साधकाला आपल्या सारखेच महापदाला नेऊन ठेवता. आपण इतके उदार वृत्तीचे आहात की आपल्या दातृत्वापुढे मेघराजाही गौण ठरावा. कारण सर्व जग मेघराजाला औदर्याचे प्रतिक मानतात, मेघराजा हा पर्जन्यचा वर्षाव केल्यावर रिक्त होतो पण आपला कृपावर्षाव हा अक्षय असून कधीही रिक्त होत नाही. आपले सार्थ वर्णन करण्याइतकी मी प्रतिभावंत नाही आपण महान आहात." असे म्हणत वंदन केले.

मैनावतीने तिनही नाथांना आदरपूर्वक राजमहालात आणले. तीन दिवस त्यांच्या पाहुणचारात कोणतीही तृटी ठेवली नाही. आसन, वसन, भूषणासह नाना प्रकारच्या अन्नपदार्थांनी त्यांचे आथित्य केले आणि त्यांचेही आशीर्वाद प्राप्त केले. मच्छिंद्रनाथ पुढील यात्रेसाठी निघाले. त्याप्रसंगी योगिनी मैनावती, राजा मुक्तचंदासह आणि ग्रामस्थांसह सैनिकी संचालनात एक कोस अंतरापर्यंत जाऊन त्यांना निरोप दिला आणि नाथांचे गुणगान करीत आपल्याला सेवा करावयाची संधी मिळाली या आनंदात, समाधानात राजमहालात परतली.

तेथून निघाल्यानंतर हे तीनही नाथ मजल दरमजल करीत, गावोगावी मुक्काम करीत जगन्नाथपुरीस येऊन पोहोचले. समुद्रस्नान आणि पूजा अर्चा दर्शनादी विधी करून जगन्नाथाला संतुष्ट केले. त्यानंतर पुन्हा भ्रमंतीसाठी निघाले. सौराष्ट्रातील एका खेडेगावात मुक्कामी राहिले. दुसऱ्यादिवशी सुर्योदया समयी गोरक्षनाथ झोळी घेऊन भिक्षेसाठी बाहेर पडले. थोड्यावेळाने झोपलेले पितापुत्र; मच्छिंद्रनाथ आणि मीननाथ उठले, मच्छिंद्रनाथांनी मीननाथास काही अंतरावर शौचास बसविले. भिक्षेसाठी घारोघरी पायपीट करून थकलेले गोरक्षनाथ परतले. गुरुदेव त्यांना म्हणाले, "गोरक्षा! बाहेर मीननाथला शौचासाठी बसवला आहे, त्याला स्वच्छ करून आण बरे." गोरक्षनाथ भिक्षा झोळी ठेऊन गेले. पाहतात तर त्या आजाण बालकाने हात, पाय आणि सर्वांग विष्ठेने भरवून लिडबिडीत केले आहे, घाणीने बरबटला आहे, त्याची अवस्था पाहून गोरक्षनाथांना फारच किळस आणि ओकारी आली. मनात म्हणाले, "श्रीगुरूंनी पण काय उद्योग करून ठेवला आहे? साधू संन्याशाला मुलेबाळे कशाला पाहिजेत? बोडकीला कुंकूवाची काय गरज, जन्मांधापुढे वसुंधरेचे वर्णन ऐकविणे काय कामाचे? घराबाहेर कधीच न पडणाऱ्याला वस्त्रभूषणे, शस्त्रास्त्रे, वैभव काय कामाची? तसा हा गुरुदेवांचा उद्योग काय कामाचा आहे? व्यर्थ कटकट झाली आहे." त्यांनी मीननाथाला उचलले आणि त्याची अवस्था गुरुदेवांना दाखविली. "महाराज! हे पहा." गुरुदेव म्हणाले, "असू दे जा त्याला नदीवर नेऊन धुवून, स्वच्छ करून आण.'' गोरक्षनाथांनी नाक दबून धरले. त्याला एका हाताने उचलून नदीवर नेले. एक काळा कातळाचा भक्कम खडक पहिला मनात म्हणाले, "आता याला अंतर्बाह्य स्वच्छ करून गुरुदेवांना दाखवितो." असा विचार करून त्याचे पाय धरले. गरगरा फिरविले आणि दाणकन खडकावर आपटले. रक्तमांसाच्या पिचकाऱ्या उडाल्या. रक्ताचे ओघळ पाण्यात मिसळले. त्या वासाने मगरी, सुसरीसारखे मांसभक्षक प्राणी गोळा झाले, मांस खाण्यासाठी त्यांची धडपड पाहून गोरक्षनाथांनी विचार केला, "आता हा तर मृत आहेच. याच्या मांसाचे काय करायचे? या मुक्या जनावरांची भूक तरी भागेल. 'जीवो जीवश्च जीवनम्' असा विचार करून कातडे सोलून काढले मांसाचे बारीक बारीक तुकडे केले आणि जलचरांना खायला दिले, सोलून निघालेली हाडे खोल पाण्यात फेकून दिली. पोटांतली आतडी, जठर, फुफ्फुस वगैरे सर्व

पाण्यात फेकून दिले फक्त त्वाचे शिवाय काही शिल्लक ठेवले नाही. खडकांवर त्वचा पसरून चांगली घासून धुतली. पाण्यात दोनचारदा बुडवून स्वच्छ केली. घडी करून खांद्यावर टाकून मुक्कामी आले. चांगली कडक उन्हाची जागा पाहून कातडे पसरून सुकावयास घातले. गुरुमहाराज काही कामानिमित्त बाहेर गेले असल्याने मुक्कामी नव्हते. गोरक्षनाथ विश्रांती घेत पहुडले. गुरुदेवांनी आल्यावर पृच्छा केली., "गोरक्षा! मीननाथ कुठे आहे?"

त्याला स्वच्छ धूऊन आणला आहे."

"बरे झाले, पण तो कुठे दिसत कसा नाही."

"तो काय तिथे सुकत ठेवला आहे"

सुकत ठेवला? तू काय बोलतो आहेस?"

महाराज, अजिबात खोटे बोलत नाही. त्याला सर्वस्वी शुद्ध करून आणला आहे आणि उन्हात सुकत ठेवला आहे. खरं वाटत नसेल तर चला बाहेर मी दाखवतो."

"कुठे आहे, दाखव पाहू." असे म्हणून गुरुदेव बाहेर आले. पाहतात तर मीननाथाचे कातडे उन्हात सुकत आहे. त्यांनी धडकन धरणीवर अंग झोकून दिले. गडबडा लोळत आक्रोश करू लागले. "अरेरे! काय केलेस हे? माझ्या बाळाला मारलास रे! जमिनीवर डोक आपटीत छाती बडवून घेऊ लागले. पाय झाडू लागले. त्या कातड्याला कवटाळून रुदन करीत म्हणाले, "बाळा! मीननाथा! मी तुझी आणि मातेची ताटातूट केली आणि येथे तुझा घात झाला. मी तुझा तात नव्हे तर वैरी आहे. आता किलोत्तलेला मी काय सांगू?, तिने बाळ पाहिजे म्हटल्यावर काय करू? स्त्री राज्यात मारुतीच्या भुभुःकाराने मृत होशील म्हणून तुझे रक्षण करण्यासाठी घेऊन आलो आणि मीच तुझा घात केला. बाळा, गोरक्ष तुझा काळ झाला." असे म्हणत आक्रंदन करीत राहिले. "बाळा, तुझा चांगुलपणा किती वर्णन करू, तीन वर्षांच्या बालवयात मला 'ताता, ताता' म्हणत बोबडी हाक मारीत होतास उषःकाली उठून माझ्या चरणांवर मस्तक ठेवून वंदन करीत होतास, मर्यादांचे पालन करीत होतास. बाळा मी कधी तुला रागे भरलो नाही. भोजन करताना तू चिमुकल्या हातानी घास भरवित होतास. बाळा मीननाथा! तुझे तोंड कधी खराब होत नव्हते, डोळ्यांत घाण दिसत नव्हती. नेमके आज विष्ठेने अंग भरवलेस! तुला पुढचे भाकीत समजले होते का? माझ्या शिवाय क्षणभरही न राहणारा तू मला कायमचा सोडून गेलास? मला एकदा तुझे तोंड दाखव, एक आलिंगन दे बाळा..." असे म्हणून हंबरडा फोडीत होते. दुसऱ्या बाजूला स्तब्ध उभे असलेले गोरक्षनाथ मनात चिंतन करीत होते, "अद्याप श्रीगुरु मायापाशांतून मुक्त झाले नाहीत" मग जवळ जाऊन त्यांच्या हाताला धरून म्हणाले, "महाराज! काय हा अज्ञानपणा मांडला आहे? कोण तूम्ही? कोणाचा पुत्र? कोणासाठी रुदन करता आहात? अहो, मीननाथ नाशवंत जड देहाचा भार टाकून हलका झाला आहे. तो तर शाश्वत, अचल, अमर आत्मा आहे, तो कसा मृत होईल? ज्योतीस्वरूप आत्मा कधी मृत पावेल का? तो आघाताने मरत नाही, शास्त्राने तुटत नाही, अग्नीने जळत नाही, पाण्यात बुडत नाही, वाऱ्याने उडत नाही की विझत नाही, तो अविनाशी आहे. शश्वत परमात्म्याचा अंश आहे. तेव्हा गुरुदेव अज्ञानी होऊन रडू नका." गोरक्षनाथांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करीत श्रीगुरुंच्या आकांत सुरूच होता. ते पाहून गोरक्षनाथांनी भस्म चिमुटीवर संजीवनी मंत्र जपून कातड्यावर

फुंकर मारताच, “तातश्री तातश्री म्हणत मीननाथ मच्छिंद्रनाथांच्या गळयाला बिलगला. नाथ त्याला म्हणाले, “बाळा कुठे गेला होतास?” गुरुदेवांना अत्यानंद झाला. त्या दिवशी त्यांनी या विषयावर चर्चा केली नाही.

दुसऱ्या दिवशी तिनही संन्याशांनी पुढचा प्रवास सुरु केला. चालता चालता गोरक्षनाथांनी विचारले, “गुरुदेव! आपण महापराक्रमी असून, मृत मीननाथाला सजीव कराल असे वाटले होते. हजारो मीननाथ निर्माण करण्याची आपली क्षमता आहे पण आपण केवढा आक्रोश केलात? त्याचे मला आश्चर्य वाटले, तरी मला आपल्या आकांताचे कारण कळेल काय? “गोरक्षा, तू मीननाथाला का मारले होते ते सांग?” तुमचा मोह, माया, वैराग्य, तपशक्ती पाहण्यासाठी मी त्याला ठार केले होते. परंतु तुम्ही का हंबरडा फडत होतात? ते सांगावे.” गुरु उत्तरले, “वत्सा! मी तुझा गुरु आहे. शिष्याची परीक्षा पाहण्यासाठी दुसरी नामी संधी नव्हती. तृष्णा, मनीषा, कामना, काम, क्रोध, मद, मोह, मत्सर या सर्व मोहमयी वासना या मायावी जगात नादांत आहेत. तुझ्या ठायी त्यापैकी काय आहे, ते पाहण्यासाठी मी आक्रोशनाट्य केले. त्यामुळे शाश्वत आणि अशाश्वत यातील फरक तुला कळला असल्याचे समजले. तू सज्ञान तर झालाच आहेस पण ह्या निमित्ताने तुझा पराक्रम सुद्धा पहावयास मिळाला, गोरक्षा! मला तुझा अभिमान वाटतोय.” श्रीगुरूंची पायधूळ मस्तकी लावून गोरक्षनाथ म्हणाले, “गुरु माऊली, ही सर्व आपलीच कृपा आहे. आपणच मला घडविले आहे. अशा प्रकारची चर्चा करीत गुरु शिष्य पायवाट तुडवीत मार्गक्रमण करीत आहेत. मागे खडावांच्या खुणांची रांगोळी उमटत आहे त्याने ती भूमी आणि मृतिका धन्य होत आहेत.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने पुत्रलाभापासून वंचित असलेल्यांना पुत्र लाभ होईल.